**विदर्भ कोकण ग्रामीण बँकेस सन २०१९-२० या वित्तीय वर्षाकरिता "पुनर्पुंजीकरण सहाय्य (Recapitalization Assistance)" म्हणून राज्य शासनाच्या १५% हिश्यापैकी उर्वरित रु. ४.७५ कोटी निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएलबीसी-१६१९/प्र. क्र.१०३/का.१४१७**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १९ नोव्हेंबर, २०२०

वाचा :

१. नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक एसएलबीसी- १६१९/प्र.क्र.१०३/का. १४१७ दिनांक १८ सप्टेंबर, २०२०

प्रस्तावना:

केंद्र शासनाचे "प्रादेशिक ग्रामीण बँक अधिनियम, १९७६" अन्वये प्रादेशिक ग्रामीण बँकांची स्थापना ग्रामीण भागाच्या आर्थिक विकासाच्या उद्देशाने केली आहे. ग्रामीण भागातील बेरोजगारी, दारिद्रय आणि सामाजिक-आर्थिक मागासलेपण दूर करण्याच्या उद्देशाने ग्रामीण अर्थव्यवस्थेला पतपुरवठा करुन विकास साधणे हे प्रादेशिक ग्रामीण बँका स्थापन करण्यामागचा उद्देश आहे.

२. महाराष्ट्र राज्यामध्ये सद्यस्थितीत "महाराष्ट्र ग्रामीण बँक" व "विदर्भ कोकण ग्रामीण बँक" या दोन "प्रादेशिक ग्रामीण बँका (RRB)" कार्यरत असून त्यामध्ये केंद्र शासनाचा ५०% हिस्सा, पुरस्कृत बँकेचा ३५% हिस्सा व राज्य शासनाचा १५% हिस्सा या प्रमाणात शासनाचे भागभांडवल गुंतविलेले आहे.

३. भारतीय रिजर्व बँकेचे परिपत्रक दिनांक २८ डिसेंबर, २००७ व समविषयाबाबतचे पत्र दिनांक २६ नोव्हेंबर, २०१३ नुसार "प्रादेशिक ग्रामीण बँकां (RRB)" यांना "भांडवल व मालमत्ता जोखीम प्रमाण (CRAR)" किमान ९% सांभाळणे आवश्यक आहे. तथापि, सन २०१७-१८ मधील दुष्काळी/नापिकीची परिस्थिती व तत्सम इतर कारणामुळे विदर्भ कोकण ग्रामीण बँकेचा "भांडवल व मालमत्ता जोखीम प्रमाण (CRAR)" हा खाली घसरल्याने तो ९% या किमान पातळीवर आणण्यासाठी विदर्भ कोकण ग्रामीण बँकेस "पुनर्पुंजीकरण सहाय्य (Recapitalization Assistance)" उपलब्ध करुन देण्याबाबत नाबार्डने शिफारस केली आहे.

४. वित्तीय सेवा विभाग, वित्त मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र दिनांक २५ नोव्हेंबर, २०१९ अन्वये विदर्भ कोकण ग्रामीण बँकेस एकूण रु. ५८३.६१ कोटी "पुनर्पुंजीकरण सहाय्य (Recapitalization

Assistance)" सन २०१९-२० ते सन २०२३-२४ या ५ वित्तीय वर्षात उपलब्ध करून देणे अपेक्षित आहे. यापैकी सन २०१९-२० या वित्तीय वर्षात केंद्र शासनाचे ५०% व राज्य शासनाचे १५% तसेच पुरस्कृत बँकेचे ३५% या प्रमाणात एकूण रु.७८.४४ कोटी विदर्भ कोकण ग्रामीण बँकेस उपलब्ध करणे आवश्यक असल्याचे कळविले आहे.

५. वित्तीय सेवा विभाग, वित्त मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र दिनांक २५ नोव्हेंबर, २०१९ नुसार मा. सर्वोच्च न्यायालया कडून SLP(C)-३९२८८/२०१२ मध्ये दिनांक २५ एप्रिल, २०१८ रोजी दिलेल्या निर्णयानुसार "प्रादेशिक ग्रामीण बँके (RRB)" मध्ये सेवा केलेल्या कर्मचाऱ्यांना राष्ट्रीयकृत बँकेतील कर्मचाऱ्यांप्रमाणे निवृत्तीवेतन लागू करण्यात आले आहे.

६. विदर्भ कोकण ग्रामीण बँकेचे "भांडवल व मालमत्ता जोखीम (CRAR)" ९% या किमान पातळीवर ठेवण्यासाठी व त्यांचे कर्मचाऱ्यांच्या निवृत्तिवेतनासाठी सन २०१९-२० वर्षासाठी मंजूर केलेला एकूण निधी रु. ७८.४४ चा १५% राज्य हिस्सा रु. ११.७७ कोटी पैकी रु. ७.०२ कोटी हा नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक एसएलबीसी- १६१९/प्र.क्र.१०३/का. १४१७ दिनांक १८ सप्टेंबर, २०२० अन्वये विदर्भ कोकण ग्रामीण बँकेस वितरित केला आहे. विदर्भ कोकण ग्रामीण बँकेस उर्वरित निधी रु. ४.७५ कोटी उपलब्ध करून करून देणेबाबत शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

विदर्भ कोकण ग्रामीण बँकेस वित्तीय वर्ष २०१९-२० करीता राज्य शासनाचा १५% हिश्याप्रमाणे "पुनर्पुंजीकरण सहाय्य (Recapitalization Assistance)" देय रुपये ११.७७ कोटी पैकी उर्वरित निधी रु. ४.७५ कोटी निधी वितरणास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१०१०/प्र.क्र. ६८/कोषा प्र - ५ दिनांक १८ एप्रिल, २०११ नुसार रुपये ४.७५ कोटी निधी "ई - पेमेंट" सुविधेद्वारे विदर्भ कोकण ग्रामीण बँकेस अदा करण्यात यावी. हा खर्च लेखाशीर्ष मागणी क्रमांक ओ-१२, "सर्वसाधारण वित्तीय संस्थांमधील गुंतवणुका (५४६५ ००१९)" या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. विदर्भ कोकण ग्रामीण बँकेस रुपये ४.७५ कोटी "पुनर्पुंजीकरण सहाय्य (Recapitalization Assistance)"आहरित व संवितरीत करण्यासाठी "उपसचिव (का- १४१७), नियोजन विभाग" हे "नियंत्रक अधिकारी" राहतील, तसेच "कार्यासन अधिकारी (का-१४२२), नियोजन विभाग" हे "आहरण व संवितरण अधिकारी" असतील. या संदर्भात होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच खर्चाची माहिती वेळोवेळी

संबंधित प्रधान महालेखापाल कार्यालय देण्याची जबाबदारी "नियंत्रक अधिकारी" म्हणून "उपसचिव (का-१४१७), नियोजन विभाग" यांची राहील.

४. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे, २०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारास अनुसरुन हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१११९१५०१४६८७१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRADNYA MAHALE

Digitally signed by PRADNYA MAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=31c8683f52ccbefd97bce49983c4151d2caf1c185c657ea855ac85f31e5f681e, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f0b9244e8f45f12e0a399cd036d6d3767c67c8349951e3e5047b7469a24cdfb2, ou=PLANNING DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRADNYA MAHALE
Date: 2020.11.19 15:03:47 +05'30'

**( प्रज्ञा महाले )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव(कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. प्रधान महालेखापाल कार्यालय (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
६. प्रधान महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
७. प्रधान महालेखापाल कार्यालय (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, मुंबई.
८. व्यवस्थापकीय संचालक, बँक ऑफ इंडिया, मुख्य कार्यालय, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, मुंबई.
९. व्यवस्थापकीय संचालक, विदर्भ-कोंकण ग्रामीण बँक, मुख्य कार्यालय, दिनदयाळनगर, रिंग रोड, नागपूर.
१०. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. उपसचिव (कार्यासन-व्यय८), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. उपसचिव (कार्यासन-अर्थ१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. उपसचिव (कार्यासन-१४११), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. उपसचिव (कार्यासन-१४२४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती, कार्यासन १४१७.